केंद्र पुरस्कृत व्याघ्र प्रकल्प योजनेअंतर्गत बोर व्याघ्र प्रकल्पाच्या विकासाकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०६ए८९१) (अनावर्ती खर्च)
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०६ए९०८) (अनावर्ती खर्च)
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०६ए९१७) (आवर्ती खर्च)
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०६ए९२६) (आवर्ती खर्च)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२१/प्र.क्र.२३ (२)/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :-१६ डिसेंबर, २०२१

**वाचा :-** १) ) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
४) केंद्र शासन, पर्यावरण, वन एवं जलवायु परिवर्तन मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.४-१(३९)/२०२०-NTCA, दि.२५.६.२०२१
५) महसूल व वन विभागाची नस्ती क्र.डब्यूएलपी०८२१/प्र.क्र.१८०/भाग-१/फ-१

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत व्याघ्र प्रकल्प या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०६, सर्वसाधारण शिक्षण, ०२, पर्यावरणीय वनीकरण आणि वन्यजीव, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०५) व्याघ्र प्रकल्प (केंद्र हिस्सा ६०%) (अनावर्ती खर्च) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०६ए८९१, खाली रु.५८५.०० लाख तर (०१) (०६) व्याघ्र प्रकल्प (राज्य हिस्सा ४०%) (अनावर्ती खर्च) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०६ए८९०८ खाली रु.३९०.०० लाख, तसेच (०१) (०७) व्याघ्र प्रकल्प (केंद्र हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०६ए९१७ खाली रु.२२७.६१ लाख व (०१) (०८)व्याघ्र प्रकल्प (राज्य हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०६ए९१७ खाली रु.२२७.६१ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली असून कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ६० टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. वित्त विभागाने व्याघ्र प्रकल्प योजनेअंतर्गत बोर व्याघ्र प्रकल्पाच्या विकासाकरिता लेखाशिर्ष २४०६ए८९१ (केंद्र हिस्सा ६०%) (अनावर्ती खर्च) खाली रु.१६.९८ लाख व लेखाशिर्ष २४०६ए८९०८(राज्य हिस्सा ४०%) (अनावर्ती खर्च) खाली रु.११.३२ लाख, तसेच लेखाशिर्ष २४०६ए९१७ (केंद्र हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) खाली रु.१८.४१ लाख व लेखाशिर्ष २४०६ए९१७ (राज्य हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) मध्ये रु.१८.४१ लाख असा एकूण केंद्र हिस्सा रु.३५.३९ लाख व राज्य हिस्सा रु.२९.७३ लाख इतका निधी खालील तक्यात नमूद उद्दिष्टांकरिता प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| **उद्दिष्ट** | **लेखाशिर्ष (रुपये लाखात)** | | | |
|---|---|---|---|---|
| | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
| | २४०६९८९१ (अनावर्ती खर्च) | २४०६ए९०८ (अनावर्ती खर्च) | २४०६ए९१७ (आवर्ती खर्च) | २४०६ए९२६ (आवर्ती खर्च) |
| ०२, मजूरी | ९.१० | ६.०६ | १६.२८ | १६.२८ |
| २१, पुरवठा व सामग्री | ०.८१ | ० | २.१३ | २.१३ |
| ५०, इतर खर्च | ० | ५.२६ | ० | ० |
| ५१, मोटार वाहने | ७.०७ | ० | ० | ० |
| **एकूण** | **१६.९८** | **११.३२** | **१८.४१** | **१८.४१** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. कोव्हीड-१९ मुळे राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व महसूल व वन विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वयेन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेलया अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.९८८/व्यय-१४, दि.२३.११.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२१७१२४८०९१९२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2021.12.17 12:49:28 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग